श्री.ह.के.केदार, कामगार कल्याण अधिकारी. महानगरपालिका यांचे निलंबन समर्थनीय नसल्याने मान्य न करण्याबाबत नाशिक महानगरपालिका स्थायी समितीने <u>मंजुर केलेला ठराव विखंडीत करणेबाबत.</u>

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक - नामपा.१९०५/४७२/प्र.क्र.-६३/०५/नवि -२५.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :-१३एप्रिल, २००५.

<u>वाचा :-</u> (१) नाशिक महानगरपालिका स्थायी समिती ठराव क्र.-१३८. दि. १७.६.०४
(२)आयुक्त. नामपा यांचे जा.क्र./आस्था/वशि-१६७४/०४.दि. २०.९.०४ चे पत्र.

<u>शासन निर्णय :-</u> श्री.ह.के.केदार, कामगार अधिकारी. नाशिक महानगरपालिका हे सामाजिक न्याय विभागाच्या नियंत्रणाखालील अण्णाभाऊ साठे विकास महामंडळावर. व्यवस्थापकीय संचालक पदावर प्रतिनियुक्तीवर कार्यरत असताना त्यांनी केलेल्या. गैरव्यवहाराबाबत सामाजिक न्याय विभागाने त्यांचे आदेश क्रमांक-एमपीसी-१०९८/ प्र.क्र.३१२/विघयो-२. दिनांक-३१.८.१९९८, अन्वये श्री.केदार यांना निलंबित करण्यात आले असून पत्र क्रमांक -एमपीसी.२००२/प्र.क्र.-२१०/विघयो-२. दिनांक १६.१.२००४ अन्वये त्यांच्या सेवा नाशिक महानगरपालिकेस प्रत्यार्पित करुन समक्रमांक, दि.२३.३.०४ व २८.५.२००४ च्या पत्रान्वये त्यांची विभागीय चौकशी करुन महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ च्या नियम १४(२) (दोन) मधील तरतुदीनुसार पुढतर्फीची कारवाई करण्यास आयुक्त, नाशिक महानगरपालिका यांना कळविण्यात आले होते. श्री.केदार हे महानगरपालिकेचे कर्मचारी असल्याने त्यांचे विरुध्द शासनाने केलेली चौकशी बेकायदेशीर असून न्यायालयीन प्रकरण चालू असताना विभागीय

चौकशीला महत्व न देता न्यायालयाचा निर्णय अंमलकारक मानण्यात यावा व त्यांचे निलंबन समर्थनीय नसल्याने मान्य न करण्याबाबत नाशिक महानगरपालिका स्थायी समितीने ठराव क्रमांक - १३८, दिनांक १७.६.०४ रोजी मंजूर केला.

०२. तथापि, श्री.केदार यांनी केलेला गुन्हा फौजदारी असल्याने, दोषी व्यक्तीस त्वरीत शासन व्हावे या धोरणाशी सुसंगत नसल्याने मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम ४५१ अन्वये शासनास असलेल्या अधिकारात ठराव क्रमांक-१३८ दिनांक-१७.६.२००४ विखंडीत करण्यात येत आहे.

श्री.केदार यांना बडतर्फ करण्याची कार्यवाही तात्काळ करुन त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास कळविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( म. दि. आढिवरेकर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

(१) आयुक्त, नाशिक महानगरपालिका, नाशिक ( २ प्रती )
(२) प्रधान सचिव, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग/विघयो-२, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
(३) व्यवस्थापकीय संचालक, लोकशाहीर आण्णाभाऊ साठे विकास महामंडळ मर्यादीत, मुंबई, मुख्य कार्यालय, २२-बी, कल्याणी केंद्र, अशोकवन, हनुमान टेकडी, आराधना बिल्डींग समोर, बोरीवली (पूर्व), मुंबई ४०० ०६६.
(४) निवडनस्ती कार्यासन - नवि.२५ (२ प्रती).

चौकशीला महत्व न देता न्यायालयाचा निर्णय अंमलकारक मान्यतेत यावा व त्यांचे निलंबन समर्थनीय नसल्याने मान्य न करण्याबाबत नाशिक महानगरपालिका स्थायी समितीने ठराव क्रमांक - १३८, दिनांक १७.६.०४ रोजी मंजूर केला.

०२. तथापि, श्री.केदार यांनी केलेला गुन्हा फौजदारी असल्याने, दोषी व्यक्तीस त्वरीत शासन व्हावे या धोरणाशी सुसंगत नसल्याने मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम. १९४९ मधील कलम ४५१ अन्वये शासनास असलेल्या अधिकारात ठराव क्रमांक-१३८ दिनांक-१७.६.२००४ विखंडीत करण्यात येत आहे.

श्री.केदार यांना बडतर्फ करण्याची कार्यवाही तात्काळ करुन त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास कळविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( म. दि. आढिवरेकर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

(१) आयुक्त, नाशिक महानगरपालिका, नाशिक ( २ प्रती )
(२) प्रधान सचिव, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग/विघयो-२, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
(३) व्यवस्थापकीय संचालक, लोकशाहीर आण्णाभाऊ साठे विकास महामंडळ मर्यादीत, मुंबई, मुख्य कार्यालय, २२-बी, कल्याणी केंद्र, अशोकवन, हनुमान टेकडी, आराधना बिल्डींग समोर, बोरीवली (पूर्व), मुंबई ४०० ०६६.
(४) निवडनस्ती कार्यासन - नवि.२५ (२ प्रती).